**ई-चलान प्रकल्पांतर्गत चूकीने वसूल केलेल्या दंडाची रक्कम परत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी- ३६२०/प्र.क्र.५५/पोल-३**

गृह विभाग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक: सीसीटी-३६१७/प्र.क्र.२/पोल-३, दि.०५.०६.२०१७.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विशा-३(अ), दि.०४.०८.२०१७.
४) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १५.११.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी ३६१७/प्र.क्र.०२/पोल-३, दि.०३.०२.२०१८.
६) शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी ३६१७/प्र.क्र.०२/पोल-३, दि.१२.११.२०१८.
७) महाराष्ट्र शासनाच्या वतीने अपर पोलीस महासंचालक (वाहतुक) आणि मे.टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांचे दरम्यान दि.११.१२.२०१८ रोजी झालेला करार.
८) अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) यांचे क्र.३२८४/२०१८, दि.११.१२.२०१८ चे कार्यादेश.
९) उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१३.०५.२०१९, दि.१४.०८.२०१९, दि.१५.१०.२०२० व दि.१३.०७.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
१०) अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) क्र.अपोमसं (वा.)/४४/वाचक/ ई-चलान/१६६६/२०२०, दि.३०.०६.२०२० चे पत्र.
११) शासन पत्र, गृह विभाग क्र. सीसीटी-३६२०/प्र.क्र.५५/पोल-३ दि.२८.०७.२०२०.

१२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी ३६१७/प्र.क्र.०२/भाग-२/पोल-३, दि.२३.०९.२०२२

१३) मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा. लि. कंपनीचे दि.२२.१२.२०२२ रोजीची देयक.

१४) अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) यांचे पत्र क्र. ADGP(Tr.)/44/Reader/ E-challan/216/2023, दि.१८.०१.२०२३

१५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२.

<u>प्रस्तावना</u> -

राज्यातील वाहनांची संख्या दिवसेंदिवस वाढत असुन त्यामुळे वाहतुक कोंडी व इतर समस्या निर्माण होत आहेत. वाहतुक नियमांचे उल्लंघन करणा-यांकडुन दंड वसुलीदरम्यान वाहतुक पोलीस कर्मचारी/अधिकारी यांना अडचणींना सामोरे जावे लागत आहे. त्यामुळे वाहतुक समस्यांवर अंकुश ठेवणे व कसुरदार व्यक्तींवर प्रभावी तथा पारदर्शकपणे कारवाई करण्यासाठी राज्यामध्ये ई-चलान प्रकल्प राबविण्यास व त्यासाठी येणा-या रु.५९,१२,३१,५०७/- एवढ्या निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता गृह विभाग, शासन निर्णय दि.०३.०२.२०१८ नुसार देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.१२ येथील शासन निर्णयान्वये राज्यात ई-चलान प्रकल्पाच्या कार्यान्वयन तसेच देखभाल व दुरुस्तीसाठी (Operation & maintenance) येणाऱ्या रु.९० कोटी इतक्या अतिरिक्त निधीच्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. तसेच ई-चलान प्रकल्पाच्या एकूण रु.१४९ कोटी इतक्या खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. ई-चलान प्रकल्पाच्या निविदा प्रक्रीयेतुन पात्र ठरलेल्या पुरवठादाराच्या निवडीस उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीने दि.०७.०९.२०१८ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार महाराष्ट्र शासनाच्या वतीने अपर पोलीस महासंचालक (वाहतुक) आणि मे. टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांचे दरम्यान दि.११.१२.२०१८ रोजी पाच वर्षांचा करार करण्यात आलेला आहे. संदर्भ क्र.८ येथील पत्राद्वारे मे. टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांना कार्यादेश देण्यात आले आहेत.

अपर पोलीस महासंचालक (वाहतुक) यांनी दि.३०.०६.२०२० च्या पत्रान्वये मे.टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांचे प्रकल्प भागीदार मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा.लि. यांचेकडून अपर पोलीस महासंचालक कार्यालयाच्या स्वंतत्र बँक खात्यामध्ये रक्कम स्विकारुन चूकीने वसूल करण्यात आलेल्या दंडाची रक्कम नागरींकांना परत करण्याबाबत कळविले होते. तसेच मे. टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांचे प्रकल्प भागीदार मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा.लि. त्यांच्या त्रैमासिक बिलासोबत या संदर्भात स्वंतत्र देयक सादर करतील तदनंतर सदर देयक मे. टेलिकम्युनिकेशन्स

कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांचे प्रकल्प भागीदार मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा.लि. यांना अदा करण्यात येईल, असा निर्णय दि.१५.१०.२०२० रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत घेण्यात आला आहे.

मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा.लि. यांना एकुण रु.१७,०९,३००/- इतकी रक्कम देय ठरत आहे. संदर्भाधिन क्र.१३ येथील मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा.लि. यांनी सादर केलेले देयक हे प्रकल्प सल्लागार मे. केपीएमजी यांनी तपासले असुन ते योग्य असुन प्रमाणित केले असल्याचे अपर पोलीस महासंचालक (वाहतुक) यांनी संदर्भ क्र.१४ येथील पत्रात नमुद केले आहे, ही बाब विचारात घेता रु.१७,०९,३००/- इतकी रक्कम मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा.लि. या कंपनीस वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे -

**<u>शासन निर्णय</u>** -

ई-चलान प्रकल्पांतर्गत चूकीने वसूल केलेल्या दंडाची रक्कम परत करण्यासाठी मे. टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांचे प्रकल्प भागीदार मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा.लि. यांना एकुण रु.१७,०९,३००/- (रुपये सतरा लाख नऊ हजार तीनशे फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च “मागणी क्र.१, २०५५- पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५ ए०३२), ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री,” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदरहु निधी आहरित करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक (वाहतुक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. तसेच त्यांनी उपरोक्त निधी आहरित करुन Krish Intratrade Pvt. Ltd. या कंपनीच्या Samarth Nagar, Aurangabad (M.S.) येथील बँक ऑफ बडोदा या बँकेच्या शाखेतील खाते क्र.76150200000469 (IFSC Code - BARBOVJAURM) या खात्यावर जमा करावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अ.क्र.२७अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग दि.०४.०४.२०२२ अनुसार

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात निधी वितरणास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२११७१३३१८१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2023.02.21 17:19:02 +05'30'

**(रुपाली कबरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
३. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. मे. टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड, टीसीआयएल भवन, ग्रेटर कैलास-I, नवी दिल्ली-४८.
११. मे. क्रिश इंट्राट्रेड प्रा.लि. प्लॉट नं.२५, दुसरा मजला, #५, साईसखा, शारदाश्रम कॉलोनी, ऑरंगाबाद-४३१००१.
१२. मे. केपीएमजी ॲडवायझरी सर्व्हिसेस प्रा.ली., मुंबई.
१३. वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा.
१४. अर्थसं-१/गृह विभाग, मुंबई.
१५. रोख शाखा/गृह विभाग, मुंबई.
१६. निवडनस्ती, पोल-३.